**ल. पा. योजना जामशेत ता. कळवण जि. नाशिक या योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: लपायो-१३१५/प्र.क्र-६०/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक: ०६ मार्च, २०२४.**

वाचा:

१. अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे यांचे पत्र क्र. प्रशा-३/२३७५, दि. ०२.०५.२०२३
२. दि. २५-०२-२०२४ रोजीच्या मा. मंत्रिमंडळ बैठकीतील निदेश.

प्रस्तावना-

मौजे जामशेत ता. कळवण जि. नाशिक येथे गिरणा नदीच्या खोऱ्यातील जामशेत नाल्यावर रु. ४३.२३ कोटी किंमतीची जामशेत ल.पा. योजना प्रस्तावित करण्यात आलेला आहे. या योजने अंतर्गत १०३० सघमी पाणीसाठा व २२७ हे. क्षेत्र सिंचनाखाली आणणे नियोजीत आहे. सदर योजनेमुळे आदिवासी शेतकऱ्यांना सिंचनाचा १०० टक्के फायदा होणार आहे. परिसरातील सिंचन व पिण्याचे पाणी समस्या सोडविण्याच्या दृष्टीने स्थानिक ग्रामस्थ व लोकप्रतिनिधींची आग्रही मागणी आहे. दि. ३१.०८.२०२३ रोजी मा. उपमुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत, प्रस्तावित ल.पा. योजना जामशेत ता. कळवण जि. नाशिक या योजनेस मृद व जलसंधारण विभागाने प्रशासकीय मान्यता देण्याचे निर्देश दिले आहेत.

सदर योजनेची अंदाजपत्रकीय किंमत रु. १०.०० कोटीपेक्षा जास्त असल्याने व योजना आर्थिक विश्लेषण मापदंडात असफल असल्याने प्रस्तावित योजनेस राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या दि. २९.०३.२०२३ बैठकीनुसार सदर योजनेस विशेष बाब म्हणून प्रशासकीय मान्यता मिळणेस्तव शिफारस करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने ल.पा. योजना जामशेत ता. कळवण जि. नाशिक या योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

मा. मंत्रिमंडळाच्या दि. २५.०२.२०२४ रोजीच्या बैठकीत सदर योजनेच्या प्रस्तावास मान्यता मिळालेली आहे.

शासन निर्णय :

मा. मंत्रीमंडळाच्या दि. २५.०२.२०२४ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार ल.पा. योजना जामशेत ता. कळवण जि. नाशिक या योजनेच्या एकूण **रु. ४३,२३,०२,६२६/- (अक्षरी रुपये त्रेचाळीस कोटी तेवीस लक्ष दोन हजार सहाशे सव्वीस फक्त)** या किंमतीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या मूळ अंदाजपत्रकानुसार उपशिर्षनिहाय तरतूद सोबत “जोडपत्र अ” मध्ये सादर करण्यात येत आहे.

१) पाणी वापर संस्था स्थापन करण्यासाठी ठेकेदारास निविदेत अटी घालून बंधनकारक करण्यात यावे. WUA स्थापन होईपर्यंत निविदेच्या १०% रक्कम ठेकेदाराच्या देयकातून कपात करण्यात यावी. संस्था स्थापन झाल्यानंतर सदरची रक्कम वितरित करण्यात यावी. अपवादात्मक परीस्थितीत संस्था स्थापित होऊ शकत नसल्यास सविस्तर करणमीमांसेसह प्रस्ताव शासनास सादर करून शासनाच्या मान्यते नंतर कपात केलेली १०% निधी वितरित करण्यात यावा. संस्था स्थापन केल्याबद्दल ठेकदारास शासन निर्णय दि.११-०२-२०२२ मध्ये तरतूद केल्या प्रमाणे मानधन देण्यात यावे.

२) प्रकल्पासाठी अधीक्षक अभियंता/प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी कार्यस्थळी भेट देऊन स्थळ व संरेखा निश्चित करुन प्रमाणित करणे आवश्यक आहे.

३) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा व नियोजित वेळेत काम पूर्ण करण्यात यावे.

४) सदरचे काम पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

६) कामांचे Geotag व वेळेसह व्हिडीओ चित्रीकरण बंधनकारक राहील.

a) काम सुरू करण्यापूर्वी.

b) २५% पूर्ण झाल्यानंतर.

c) ५०% काम पूर्ण झाल्यानंतर.

d) ७५% काम पूर्ण झाल्यानंतर.

e) १००% काम पूर्ण झाल्यानंतर.

या कामात पाच टप्प्यात Geotag व्हिडीओ चित्रीकरण करण्यात यावे. प्रत्येक टप्प्याच्या व्हिडिओ चित्रीकरणाचा कालावधी किमान ३ मिनिटाचा आवश्यक राहील. काम सुरू करण्यापूर्वी एका बाजूने चित्रीकरण सुरुवात करून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण चित्रीकरण करण्यात यावे.

अ) व्हिडीओ चित्रीकरण करताना प्रत्येक वेळेस कामाचे जलसंधारण अधिकारी व कंत्राटदार/ त्यांचा प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे. किमान दोन वेळेस खुद्द कंत्राटदाराची उपस्थिती आवश्यक आहे.

ब) चित्रीकरणांमध्ये किमान दोन टप्प्यांमध्ये उप अभियंता व एका टप्प्यामध्ये कार्यकारी अभियंता यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

क) देयके पारित करताना मोजमाप पुस्तिका सोबत चित्रीकरणाचा Pen drive सादर करावा. तसे मोजमाप पुस्तिकेत नमूद करावे.

ड) सदर चित्रीकरणाची प्रत कार्यकारी अभियंता यांनी तपासावी व वरील सूचनांप्रमाणे चित्रीकरण नसल्यास देयक पारित करून होणार नाही.

इ) चित्रीकरणाची किमान १५ सेकंदांची संक्षिप्त प्रत विभागाच्या जिओपोर्टलवर Upload करण्यात यावी.

७) काम पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणनियंत्रणाच्या दृष्टीने विभागाच्या दक्षता व गुणनियंत्रण पथकाकडून तपासणी करण्यात यावी.

८) वरील प्रमाणे प्रकल्पाचे हस्तांतरण झाल्यानंतरचा देखभाल दुरुस्तीचा खर्च लाभार्थ्यांकडून करण्यात यावा.

९) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नागरी २०११/प्र.क्र.१९२/निधी जल-१ दिनांक ०२ फेब्रुवारी २०१२ अन्वये निर्धारित तरतुदींचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे.

१०) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

११) सदर कामाची अंमलबजावणी करतांना दर्जा व गुणवत्ता उत्कृष्ठ ठेवण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

१२) पाणीसाठा करण्याच्या दृष्टीने जिल्हा जलसंधारण अधिकारी व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी काम पुर्ण झाल्यावर प्रमाणित करणे आवश्यक राहील.

१३) शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/ सिं. व्य. (कामे) दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

१४) प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत व नियोजनानुसार काम पुर्ण करण्यात यावे.

१५) आवश्यकतेनुसार अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने, बाह्य दरसूची बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

१६) सदर योजनेमुळे १०.२० हेक्टर वनजमिन बाधित होत आहे. याअनुषंगाने योजनेचे काम सुरु करण्यापुर्वी वन विभागाच्या परवानगीबाबत कार्यवाही करण्यात यावी.

१७) राज्य तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील उपस्थित मुद्द्यांची पूर्तता करण्यात यावी.

१८) सदर योजनेस तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी सक्षम स्तरावरुन संकल्पन करून घेण्यात यावे.

२.०. या योजनेच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रं. ZH-५**
**४७०२, लहान पाटबंधारे योजना**
**४७०२ ए ०२८**
**००**
**१०१, भूपृष्ठ जल,**

**लहान पाटबंधारे**
**(०१) लहान पाटबंधारे योजना,**
**१०१-२५० हे सिंचन क्षमता (कार्यक्रम),**
**५३ मोठी बांधकामे**

सदरहू योजनांच्या दुरुस्तीच्या कामास वरील लेखाशिर्षांतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**३.०** सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने अनुक्रमे नियोजन विभागाचा अनौ.सं.क्र. २/१४३४, दि. ०३.०१.२०२४ व वित्त विभागाचा अनौ.सं.क्र. ५१३/२०२३/व्यय-१५, दि. २३.११.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच संदर्भीय पत्र क्र. २ अन्वये दि. २५.०२.२०२४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने सदर प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३०६११३४०४१४२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL MAHADEV KALE

Digitally signed by SUNIL MAHADEV KALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5c8d23e6cc09fb2bb4aa1777dadbfbb405c54e877afe06798f54168b9f08b98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=30B26A65349009C49CCA04C5AECBC47F35D7524B402BBD5D7FA6DDD215CFF18D, cn=SUNIL MAHADEV KALE
Date: 2024.03.06 11:43:03 +05'30'

**( सु. म. काळे )**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
४) सर्व मा.संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधानसचिव/सचिव.
८) मा. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
९) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१०) आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
१२) अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता,मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.

१३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
१४) प्रादेशिक दक्षता गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे.
१५) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
१६) कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती (जल-१).

**मृद व जलसंधारण विभाग**

**जोडपत्र 'अ'**

**ल.पा. योजना जामशेत ता. कळवण जि. नाशिक या योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत गोषवारा.**

**शासन निर्णय क्रमांक: लपायो-१३१५/प्र.क्र- ६०/जल-१ दिनांक: ०६ मार्च, २०२४.**

| अक्र. | शीर्ष उपशीर्ष/ कामे | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|
| १ | ए- प्राथमिक | २५,०००.०० |
| २ | बी- जमीन | ३,५६,०१,४४८.०० |
| ३ | सी- कामे | २७,३९,७०,५०९.०० |
| ४ | डि- मुख्य विमोचक | १,४५,८१,९३०.०० |
| ५ | के- इमारत | ५,०००.०० |
| ६ | एम- वृक्षारोपण | ५,०००.०० |
| ७ | ओ- संकिर्ण | ५,०००.०० |
| ८ | पी देखभाल -दुरुस्ती | ७,६१,४१३.०० |
| ९ | आरदळणवळण - | ५०,०००.०० |
| १० | IInd मुख्य कालवा | १२,७९,५०८.०० |
| ११ | सिमेंट नाला बंधारे २ | १,४७,३३,२०३.०० |
| | **एकुण** | **३४,१०,१८,०१२.००** |
| १२ | वस्तु व सेवा कर १८% | ५,४८,२१,७२७.०० |
| १३ | कामगार विमा १% | ३०,४५,६५२.०० |
| १४ | PMC Charges २% | १८,७७,९२१.०० |
| १५ | Contingencies २% | ६०,९१,३०३.०० |
| | **एकुण** | **४०,६८,५४,६१५.००** |
| १६ | Centage charges १०% (भुसंपादन, स्वामित्व शुल्क, वस्तु व सेवा कर, विमा वगळून) | २,५४,४८,०११.०० |
| | **एकूण एकंदर** | **४३,२३,०२,६२६.००** |

**(रुपये त्रेचाळीस कोटी तेवीस लक्ष दोन हजार सहाशे सव्वीस फक्त)**

SUNIL MAHADEV KALE

Digitally signed by SUNIL MAHADEV KALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=d5c8d23e6cc09fb2bb4aa1777dadbfbb405c54e877afe06798f54168b9f08b98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=30B26A65349009C49CCA04C5AECBC47F35D7524B402BBD5D7FA6DDD215CFF18D, cn=SUNIL MAHADEV KALE
Date: 2024.03.06 11:43:22 +05'30'

**(सु. म. काळे)**

**मुख्य अभियंता तथा सह सचिव**

**महाराष्ट्र शासन**